शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधींनंतर अधिक वास्तव्य करण्याबद्दल दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क आकारणीबाबत..
दंडनीय दरात वाढ

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः - शानिवा-२५१७/प्र.क्र.३३/२३-अ
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- -३० ऑगस्ट, २०१८

पहा:-१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा १०९५/प्र.क्र.८०७/९५/२३-अ, दि.१०.०९.१९९६.
२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा २५०६/प्र.क्र.७५८/०६/२३-अ, दि.०१.११.२००६.
३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा १०१०/विसआ/प्र.क्र.७४७/२३-अ, दि.११.०४.२०११.
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा २५११/प्र.क्र.२३९/११/२३-अ,दि.२९.०७.२०११.
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा २५१७/प्र.क्र.३३/१७/२३-अ, दि.१५.०४.२०१७.
६) शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.संकीर्ण २०१३/प्र.क्र.९६/मिव्य-२, दि.०१.०६.२०१८

प्रस्तावना:-

संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१५.०४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये, बृहन्मुंबईतील सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारीतील शासकीय निवासस्थानातील अनुज्ञेय कालावधीनंतरच्या वास्तव्यासाठी शासकीय अधिकारी/ कर्मचारी/ त्यांच्या कुटुंबियांकडून वसूल करावयाचा अनुज्ञप्ती शुल्काचा दंडनीय दर रु.१००/- प्रति चौरस फूट दरमहा एवढा विहित करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन क्र.६ येथील दि.०१.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाने त्यांच्या अखत्यारीतील बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानातील अनुज्ञेय कालावधीनंतरच्या वास्तव्यासाठी आकारावयाच्या अनुज्ञप्ती शुल्काचा दंडनीय दर रु. रु.१५०/- प्रति चौरस फूट दरमहा असा केला आहे.

२. तथापि, दंडनीय दरात वाढ करुनही शासकीय अधिकारी व कर्मचा-यांमध्ये सेवानिवृत्तीनंतर तसेच बदली झाल्यानंतरसुध्दा शासकीय निवासस्थाने अनधिकृतपणे ताब्यात ठेवण्याची प्रवृत्ती दिसून येत आहे. परिणामी, बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात कार्यरत असलेल्या प्रतिक्षायादीतील गरजू अधिकारी/कर्मचा-यांना शासकीय निवासस्थानापासून अनेक वर्षे वंचित राहावे लागत आहे. सबब, अशा प्रवृत्तीला आळा घालणे आवश्यक आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने दि.०१.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दंडनीय दरात केलेली वाढ विचारात घेता बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानांच्या अनुषंगाने आकारावयाच्या अनुज्ञप्ती शुल्काच्या दंडनीय दरात एकवाक्यता असण्याच्या दृष्टीने बृहन्मुंबईतील सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारीतील शासकीय निवासस्थानांच्या अनुषंगाने आकारण्यात येणा-या दंडनीय दरात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

संदर्भाधिन क्र.५ येथील दि.१५.०४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरच्या वास्तव्याबद्दल विहित करण्यात आलेला दंडनीय दर (अनुज्ञप्ती शुल्क ) रु.१००/- प्रति चौरस फूट दरमहा वरुन रु.१५०/- प्रति चौरस फूट दरमहा असा करण्यात येत आहे.

२. हे आदेश दिनांक ०१ सप्टेंबर,२०१८ पासून अंमलात येतील.

३. याअन्वये हेही स्पष्ट करण्यात येते की, या आदेशाच्या दिनांकापूर्वी ज्या प्रकरणी ३१.०८.२०१८ या दिनांकानंतरच्या कालावधीसाठी पूर्वीच्या दरानुसार (रु.१००/- प्रती चौरस फूट दरमहा) मुदतवाढ/परवानगी देण्यात आलेली आहे अशा प्रकरणी देखील दि.०१.०९. २०१८ पासून रु.१५०/- प्रति चौरस फूट दरमहा हा दर लागू राहील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७९/१८/सेवा-५,दि.१३.०६.२०१८ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८०८३०१०५५२८३८०७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjana Pradeep Khopde

Digitally signed by Sanjana Pradeep Khopde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=162267a166279e51cd3f1cc6e10b61ce9868a85926 0375a1bba3e5f88931d998, cn=Sanjana Pradeep Khopde
Date: 2018.08.30 11:19:54 +05'30'

**( सं.प्र.खोपडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मुख्यमंत्री/सर्व मंत्री/सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
५. प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ शाखा,मुंबई (पत्राने)
६. प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई(पत्राने)
७. प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई (पत्राने)
८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर
१०. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई
११. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,नागपूर
१२. अपर मुख्य सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. प्रधान सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१५. अधिक्षक अभियंता,मुंबई मंडळ,मुंबई
१६. कार्यकारी अभियंता (सा.बां.) इलाखा शहर विभाग,बांधकाम भवन,फोर्ट,मुंबई
१७. कार्यकारी अभियंता,मध्य मुबई,वरळी,मुंबई-४०० ०१८
१८. कार्यकारी अभियंता,उत्तर मुंबई विभाग,दादाभाई नौरोजी मार्ग,अंधेरी (प),मुंबई-४०० ०५८
१९. कार्यकारी अभियंता,इमारती बांधकाम विभाग,कामगार हॉस्पिटल आवार,मुलुंड (प),मुंबई
२०. सक्षम प्राधिकारी,बृहन्मुंबई,जुने जकात घर,मुंबई-४०० ०२३
२१. सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई
२२. सर्व विभागीय आयुक्त,
२३. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
२४. निवड नस्ती/का-२३-अ